**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना विमाकवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै.(श्री.) व्यंकटी यशवंत बोपचे, सहायक शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२५/प्र.क्र.२/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १० मार्च, २०२५

संदर्भ :-

(१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१

(२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.

(३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पारशिवनी यांचे पत्र क्र. पंसपा/ शिक्षण/आस्था/ ४३९/२०२४, दिनांक २०/०८/२०२४ रोजीचे प्रमाणपत्र

(४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक ) यांचे पत्र शिसंमा/२०२४/टि-७/कोव्हिड-१९/विमा कवच/सहाय्य/व्ही. वाय.बोपचे/९२२, दि. ०९/०१/२०२५

ज्ञापन :-

कै.(श्री.) व्यंकटी यशवंत बोपचे, सहायक शिक्षक,लाल बहादुर शास्त्री व कनिष्ठ महाविद्यालय, बाबुळवाडा ता. पारशिवनी जि. नागपूर यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २४/०४/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) बोपचे यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.(१) येथील दि. २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांनी संदर्भ क्र.(४) येथील पत्रांन्वये शिफारससह सादर केला आहे.

३. कै.(श्री.) व्यंकटी यशवंत बोपचे, सहायक शिक्षक,लाल बहादुर शास्त्री व कनिष्ठ महाविद्यालय, बाबुळवाडा ता. पारशिवनी येथे आस्थापनेवर कार्यरत असल्याबाबत शिक्षणाधिकारी (माध्य) जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रमाणित केले आहे.

४. तहसिलदार पारशिवनी यांचे दि.०५/०४/२०२१ रोजीच्या आदेशान्वये कै.(श्री.) बोपचे यांची कोरोना लसीकण करिता पारशिवनी तालुक्यात वय ४५ वर्षावरील सर्व नागरिकांना लसीकरण देण्याच्या मोहिमेकरिता दिनांक ०६/०४/२०२१ पासून सदर आदेशातील अनु.क्र.५ येथे नमूद केल्याप्रमाणे उमरी पाली लसीकरण केंद्रावर नियुक्ती करण्यात नियुक्ती करण्यात आली होती वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, नवेगाव खैरी यांनी कै.(श्री.) बोपचे लसीकरण मोहिमेअंतर्गत

ऑनलाईन रजिस्ट्रेशन करण्याकरिता दिनांक ०६/०४/२०२१ रोजी उमरी पाली या गावात कर्तव्यावर हजर असल्याबाबत प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) बोपचे यांची दि. १२/०४/२०२१ रोजी केलेली RTPCR कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, दहेगावं जोशी, यांनी प्रमाणित केले आहे. तसेच, रेडिओलॉजिस्ट, श्री. प्रणव ठोंबरे यांनी कै.(श्री.) बोपचे यांची दिनांक १३/०४/२०२१ रोजी घेतलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटीव्ह आल्याचे दिसून येते. वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, नवेगाव खैरी यांचे उपस्थिती अहवालानुसार कै.(श्री.) बोपचे हे दिनांक ०६/०४/२०२१ रोजी उपस्थित होते. तसेच, वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, दहेगावं जोशी, यांनी प्रमाणित केल्यानुसार कै.(श्री.) बोपचे हे दिनांक १२/०४/२०२१ रोजी कोव्हिड पॉझिटीव्ह झाले आहेत, त्यानुसार दिनांक ०२/०४/२०२१ व दिनांक ०६/०४/२०२१ रोजी नमून दिलेल्या कर्तव्यावर हजर असल्याबाबत गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पारशिवनी यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार कै. (श्री.) बोपचे हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर होते.

६. कै. (श्री.) बोपचे यांचे दिनांक १४/०४/२०२१ ते दिनांक २४/०४/२०२१ या कालावधीत श्री राधा कृष्णा हॉस्पीटल ॲन्ड रिसर्च इनस्टीटयुट, नागपूर येथे उपचार करण्यात आले. दिनांक २४/०४/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे श्री राधा कृष्णा हॉस्पीटल ॲन्ड रिसर्च इनस्टीटयुट, नागपूरचे वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

७. कै.(श्री.) बोपचे यांचा दिनांक २४/०४/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र उपनिबंधक (जन्म व मृत्यु), लकडगंज झोन नं.८, नागपूर यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

८. कै. (श्री.) बोपचे यांच्या पत्नी श्रीमती कल्पना व्यंकटी बोपचे यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक २६/०८/२०२४ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब, कै. (श्री.) बोपचे यांच्या वारसास वित्त विभागाच्या दि.२९/०५/२०२० च्या शासन निर्णयान्वये रु. ५० लक्ष रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात कवच मिळावे असा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांनी शिफारसीसह सादर केला आहे.

९. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, नागपूर यांनी कै. (श्री.) बोपचे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) कल्पना व्यंकटी बोपचे (२) श्रीमती कृतिका राजेश काकडे (३) कु. अनिषा व्यंकटी बोपचे (४) श्री.कृणाल व्यंकटी बोपचे यांना घोषित केले आहे.

१०. कै.(श्री.) व्यंकटी यशवंत बोपचे, सहायक शिक्षक,लाल बहादुर शास्त्री व कनिष्ठ महाविद्यालय, बाबुळवाडा ता. पारशिवनी यांना २२०२ ०४४२ या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रमाणित केले आहे.

११. (१) वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, नवेगाव खैरी (२) वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र, दहेगावं जोशी, (३) श्री राधा कृष्णा हॉस्पीटल ॲन्ड रिसर्च इनस्टीटयुट, नागपूरचे वैद्यकीय प्रमाणपत्रानुसार (४) मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, नागपूर यांनी कै.(श्री.) बोपचे यांचे कायदेशिर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) कल्पना व्यंकटी बोपचे (२) श्रीमती कृतिका राजेश काकडे

(३) कु. अनिषा व्यंकटी बोपचे (४) श्री.कृणाल व्यंकटी बोपचे यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र. २५६/व्यय-५, दिनांक ०४/०३/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००) (०१) सर्वसाधारण शाळांना सहायक अनुदान
अनिवार्य (२२०२ ०४४२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना वितरित झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेअसून, त्याचा संकेतांक २०२५०३१०१८२४५३२१२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.10 18:26:18 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), नागपूर

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस.एम.४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती कल्पना व्यंकटी बोपचे, सुपर टाऊन जवळ, वार्ड नं.६ पारशिवनी, पारशिवनी नागपूर-४४११०५
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.०२/२०२५)